**गाळप हंगाम २०११-१२ साठी सहकारी साखर कारखान्यांना अल्प मुदत कर्ज व त्यावरील व्याजास शासन थकहमी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**शासन निर्णय क्रमांक : ससाका १०११/ प्र.क्र. २०२/ ३-स**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

**दिनांक : २८ सप्टेंबर , २०११.**

**संदर्भ :-** १)शासन निर्णय समक्रमांक दिनांक २४ ऑगस्ट,२०११

२) साखर आयुक्तालयाचे पत्र क्र. साआ/प्र.क्र.१३/ पू.हं.अ.मु./ कक्ष-७/अर्थ-२, दिनांक २-९-२०११

३) महाराष्ट्र राज्य सहकारी बँक म. मुंबई यांचे पत्र क्र. कृ.औ.वि./शर्करा/ फा/अल्प मुदत/४९०/२०११-१२, दि. १३.७.२०११

.

**प्रस्तावना :-**

दिनांक २१ सप्टेंबर, २०११ रोजी झालेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी प्रस्तावित केलेल्या ५ सहकारी साखर कारखान्यांना **रु.३७२४.६८** लाख अल्पमुदत कर्ज व त्यावरील व्याजास शासन थकहमी देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार सोबत जोडलेल्या परिशिष्टामधील ५ सहकारी साखर कारखान्यांना **रु.३७२४.६८** लाख अल्पमुदत कर्ज व त्यावरील व्याजास शासन थकहमी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

दिनांक २४ ऑगस्ट, २०११ रोजी झालेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार ५ सहकारी साखर कारखान्यांनी **अल्प मुदत कर्ज मंजूरीबाबतच्या अटींची पूर्तता केली असल्याने गाळप हंगाम २०११-१२ साठी सदर कारखान्यांना अल्प मुदत कर्ज रुपये ३७२४.६८ लाख (रुपये सदतीस कोटी चोवीस लाख अडुसष्ट हजार फक्त) व त्यावरील व्याजास शासन थकहमी देण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार सोबतच्या परिशिष्टातील ५ सहकारी साखर कारखान्यांना अल्प मुदत कर्ज रुपये ३७२४.६८ लाख (रुपये सदतीस कोटी चोवीस लाख अडुसष्ट हजार फक्त) व त्यावरील व्याजास शासन थकहमी देण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

२. वरीलप्रमाणे थकहमी दिलेल्या साखर कारखान्यांनी कोणत्या कार्यक्षेत्रात किती ऊसाचे गाळप करणे बंधनकारक राहील हे साखर आयुक्त यांनी निश्चित करुन द्यावे. त्यापेक्षा कमी गाळप करुन किंवा मध्यंतरी कारखाना बंद केल्यास संबंधित बँकांनी वरीलप्रमाणे थकहमीवर दिलेल्या कर्जाची सक्तीने वसूली करावी व साखर आयुक्तांनी त्या त्या कारखान्यांविरुध्द कायदेशीर कार्यवाही करावी. या अटीसह थकहमी मंजूर करण्यात यावी.

३. संबंधित बँकानी वरीलप्रमाणे थकहमी दिलेल्या कर्जाची व्याजासह वसूली हंगाम संपण्यापूर्वी प्राधान्याने करावी. त्याशिवाय बॅकांना इतर कर्जाची वसूली करता येणार नाही, ही अट थकहमी देताना टाकण्यात यावी.

४.		थकहमी दिलेले कर्ज एकाच वेळी बँकानी वितरीत न करता गाळप हंगामाच्या पूर्व तयारीची प्रगती लक्षात घेऊन कर्जाची रक्कम वितरीत करण्यात यावी.

**५.**		मंत्रिमंडळाने उपरोक्तप्रमाणे  शासन थकहमी देण्यास मान्यता दिलेल्या कर्जाबाबतचा कारखानानिहाय  तपशील सोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये नमूद करण्यात आला आहे.

**६.**		सोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या ५ कारखान्यांची पात्र कर्ज मर्यादा विचारात घेऊन  संबंधित   जिल्हा मध्यवर्ती सहकारी  बँकेने कर्ज  व त्यावरील व्याजाच्या परतफेडीच्या विवरणपत्रांसह शासकीय थकहमी देण्याबाबतचा प्रस्ताव शासनास तात्काळ सादर करावा.

**४.**		मंत्रिमंडळाच्या निर्णयाच्या अनुषंगाने हंगाम २०११-१२ मध्ये उपलब्ध असलेल्या संपूर्ण ऊसाचे गाळप करणे कारखान्यांना सोयीचे व्हावे, या दृष्टिकोनातून वरीलप्रमाणे प्रशासकीय आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

**५.**		सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक  **२०११०९२८१०४६१८००१**  असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( गो. ना. रणखांबे )
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१)	मा. मुख्यमंत्री.
२)	सर्व मंत्री / राज्यमंत्री.
३)	मा. मुख्य सचिव.
४)	प्रधान महालेखाकार ( लेखापरिक्षा - १ ), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५)	प्रधान महालेखाकार,  Vaucher Level Computor Section ( V L C) ,  महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६)	प्रधान महालेखाकार ( वाणिज्यिक ), महाराष्ट्र राज्य मुंबई.
७)	सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८)	साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
९ )	वित्त विभाग, व्यय-२ / हमी शाखा, मंत्रालय, मुंबई.
१०)	अध्यक्ष / कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्यादित, मुंबई.
११)	अध्यक्ष / कार्यकारी संचालक, जिल्हा मध्यवर्ती  सहकारी बँक मर्यादित (सर्व).
१२)	कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ मर्यादित, साखर भवन, नरिमन पॉईट, मुंबई.
१३)	कार्यकारी संचालक, संबंधित सहकारी साखर कारखाना.
१३)	अवर सचिव, २-स / कक्ष अधिकारी, १६-स व १७-स, सहकार, पणन  व वस्त्रोद्योग विभाग.
१४)	निवड नस्ती, ३-स.

## तक्ता -अ
## ( जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक )

| नक्त मूल्य (-) उणे असलले व मागील गाळप हंगाम घेतलेले ५० % पेक्षा जास्त ऊस असलेले ससाकांचे पूर्व हंगामी व अल्प मुदत कर्ज मागणीचा तपशील (रु. लाखांत) | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | सहकारी साखर कारखान्याचे नाव | गाळप क्षमता प्रतिदिन | ऊस उपलब्धता (लाख मे.टन) | कर्जमागणी | | | मंजूरीस पात्र |
| | | | | पूर्व हंगामी | अल्प मुदत | एकूण | अल्प मुदत |
| १ | शिरपूर शेतकरी, धुळे (जि.म.स.बँक) | २५०० | २.५१ | ११६० | ११७६ | २३३६ | ४४५.२७ |
| २ | मधुकर, जळगांव (जि.म.स.बँक) | २५०० | २.५० | -- | ९५१ | ९५१ | ४९५.०० |
| ३ | आजरा, कोल्हापूर (जि.म.स.बँक) | २५०० | ३.३९ | -- | १००० | २१०० | ८८२.०० |
| ४ | दौलत, कोल्हापूर (जि.म.स.बँक) | ३५०० | ५.५० | ४०० | ८५० | १२५० | १३५४.८५ |
| ५ | सिध्देश्वर, औरंगाबाद (जि.म.स.बँक) | २५०० | २.७० | -- | १००० | १,००० | ५४७.५६ |
| | एकूण | | | १५६० | ६४९७ | ८०८०५७ | ३७२४.६८ |